८ जून २००९
अंक : ३०

ई-साहित्य प्रकाशन

पर्यावरण दिन विशेषांक

# नेटाक्षरी

"I DREAMT THE EARTH WAS CRYING"

५ जून ह्या पर्यावरणदिनानिमित्त नेटाक्षरी आवाहन करीत आहे,आपल्या पर्यावरणाच्या रक्षणासाठी.
जी आई आपला सांभाळ करीत आहे तिला आज आपली गरज आहे.तिचे ऋण फेडण्याचा हा एकच मार्ग..

"Come here, child, help me, come here and meet me!
There's a lot to see good things..and bad things..



जागे व्हा!

पृथ्वीमाता मदतीसाठी

विनवते आहे !!!

यजमान संपादक –
सुरुचि नाईक ( नागपूर )

अतिथी संपादक –
सुरेश पेठे ( पुणे )

सहसंपादक –
सोनाली घाटपांडे ( पुणे )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
रेणूका रेपाळ ( अमेरिका )
आनंद माने ( सोलापूर )
सारंग भणगे ( पुणे )
सचिन काकडे ( मुंबई )
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )
नाम गुम जायेगा ( ठाणे )

हे चित्र आहे एका ६ वर्षाच्या मुलाचं!
तो अबोध बाळ जे बंद डोळ्यानेही पाहू शकतो,
ते आपण सुजाण लोक उघडया डोळ्याने
पाहू शकत नाही का? की , बघून देखील दुर्लक्ष करतो?

## हया अंकात वाचा :



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच
सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

## कुऱ्हाडीचा दांडा

कुऱ्हाडीचा दांडा, गोतास काळ
माणसाचा अंतकाळ माणूसच आहे

माणसाची संख्या वाढे बेसुमार
भुई सी भार , वाढतसे

वाढत्या प्रजेने, तोडीयले झाड
जाहले उजाड, डोंगरमाथे

बोडके डोंगर, गेलासे पाऊस
जाहली भकास माळराने

येता दुष्काळ, पाण्याची भ्रांत
कोस पादक्रांत. घोटासाठी

नाही जलस्त्रोत,विजेची कपात
घोर अंधारात, काढावी रात्र

वाढली वाहने ,वाढले प्रदूषण
आजारासी आवतण आयतेच

कोणा होई सर्दी, कोणा होई दमा
नाही याची तमा कोणालाही

वाढले प्रदूषण, वाढले तापमान
कमी आयुःमान झाले जीवसृष्टीचे

– हरिश दांगट



## कोणी ऐकेल का माझी व्यथा

कोणी ऐकेल का माझी व्यथा

जळतेय मी...........
संपतेय मी............
विझतेय मी ..........

मी श्वास घेते
मलाही दुःख होते
तुमच्या एकएक घावाने
रक्तबंबाळ झालेय मी

पण..........

कोणी ऐकेल का माझी व्यथा

जळतेय मी...........
संपतेय मी............
विझतेय मी ..........

मी वसुंधरा !!!

– भारती सरमळकर



## होने दो खुशहाल जहाँ

जब भी दिल चाहा
झरनोसे,पेडोकी उची मिनारोको छू लू
किसी हसिनाकी जुल्फोसे खेलू
किसी का पसीना ठंडी हाथोसे छू लू
कितना मजा आता था
हरियालीयोमे घूमनेसे
ताजा ताजा लगता था वो गुलाब का फूल
किसी हसिनाकी बालोमे
क्या खूब खिल उठता था
लेकिन क्या आगये ये कारखाने
वो धुआ छोडती चिमनियाँ
कर डाला बीमार मुझे
और ये समा भी...
कोई नही सुनता  मेरी आवाज
ये प्रदूषण का राक्षस बाहे फैलाये
खडा है मुझे निगलने के लिये

अरे.. कोई तो सुनो मेरी अन्तःपुकार
फिर एक बार झूमने दो मुझे
होने दो खुशहाल जहाँ

– कल्पी जोशी

## उन्नती

हे माणसा जेव्हा तू
जंगलात रहायचास
जंगली प्राणी तुझे मित्र होते
नैसर्गिकच होते!
जेव्हा तू प्रगतीशील झालास
गावं बसवलीत, शहरं झाली
बंजर जमिनीत
हरितक्रांती केलीस..
प्रगतीचे तत्वच हरितक्रांती
आता तुला काय झाले?
लोचट नजर आणि
बरबटलेली वासना...
सतत विस्फोटक विचारांनी
ग्रासलेला
प्रलयंकारी शस्त्रच शोधून
काढतोस तू..
तुला नाही वाटत तू स्वतःसाठी
मृत्यू तयार करतोयस?
विषारी विचारांचे.....
अजगर तुझ्या शरीराभोवती
गुंडाळतोयस हीच तूझी प्रगती!

- कल्पी जोशी



## बिन फटाक्याची अजून एक दिवाळी

खात्यामधे खडखडाट
तरी दारामध्ये दणदणाट
इन्व्हर्टर च्या विजेचा
गल्लोगल्ली लखलखाट

झगमगाट ...दणदणाट
आनंद साजरा करणं हेच का?
कानाचे पडदे फाडणं यात कसला आनंद?
हा कोणता सण?

पणत्यांच्या माळांचा सण हा
रोषणाईचा नव्हे, उत्साहाचा फराळाचा
सण हा, आतिषबाजीचा नव्हे..

दरवर्षी वाटतं, चार दिवस फिरायला जावं,
कोलाहलापासून दूर रहावं
पण
माझही घर झगमगतं, अन मला
अडवून ठेवतं.
बिन फटाक्याची अजून एक दिवाळी
मी साजरी करतो..
चार दिवस ऑफिस नाही
याच आनंदात डूबतो

– रणजीत पराडकर







## निसर्गाची शिकवणी

निसर्ग बरच काही शिकवतो आपल्याला
शिकलं पाहिजे आपण ते आत्मसात करायला

गुलाब शिकवतो आपल्याला
काटयात राहून हसायला
दलदलीतलं कमळ सांगतं
संकटात तग धरायला
शेतावर डुलणारं सूर्यफुल सांगतं
प्रकाशाकडे वाटचाल करायला
शिकलं पाहिजे आपण ते आत्मसात करायला

स्वछंदी विहरणारे पक्षी शिकवतात
आकाशात उंच भरारी घ्यायला
इवल्या मुंग्या श्हिकवतात
एकजूटीने रहायला
सुंदर फुलपाखरं शिकवतात
जीवन रंगीबेरंगी बनवायला
शिकलं पाहिजे आपण ते आत्मसात करायला

झरा सांगतो
निखळपणे जगायला
सगळं पोटात घेते नदी
शिकवते आईपण जपायला
निर्सगाचा सदस्य सांगतो
आनंदाची उधळण करायला
शिकलं पाहिजे आपण ते आत्मसात करायला

फी न घेता शिकवून सुद्धा
देतो आपण त्रास निसर्गाला
त्यामुळेच कधी कठीण होतं
सावरायला
शेवटी अति तेथे माती
कारणीभूत ठरतो निसर्गाच्या कोपाला
शिकलं पाहिजे आपण ते आत्मसात करायला

– सोनाली घाटपांडे

ए.पी.जे अब्दुल कलाम यांच्या एका पत्राचा हा काव्यानुवाद. हे पत्र २०७० मधून आलेलं आहे आणि त्या वेळेची परिस्थिती यात दिसते. एका ५० वर्षाच्या वृद्धाने लिहिलेलं हे पत्र!

हया पत्राचं पॉवर पॉइंट प्रेझेन्टेशन आपण आंतरजालावर बघू शकता.

(खालील अनुवाद – सौ. सुरुचि नाईक)

मी नुकतच ५० पूर्ण केलय, भासतो मात्र ८५ चा!
मला किडनीचा त्रास आहे , पाणी कमी पिण्यामुळे
वेळ नाही माझ्यापाशी , जगण्याचा...
मी ५० पूर्ण केलय , सगळयात वयस्क व्यक्ती , मी या समाजाचा...
माझ्या लहानपणी परिस्थिती,वेगळी होती...हिरवळ होती
पाऊस होता....जगण्यातली ,मजा होती...
आज ते सारं मी फक्त स्मरतो,
कृत्रिम तेलाच्या टॉवेलने ,अंग साफ करतो.
लहानपणी आयाबायांचे सुंदर लांब केस असत
कार धुण्यासाठी पाण्याचे ,पाईप असत...आता केसच नाही कुणाला..
कारण पाणीच नाही धुण्याला,पोरांच्या डोळयात ऐकून
काळ जुना जागा आहे फक्त आश्चर्याला.
आठवतय मला "पाणी वाचवा" चे फलक असायचे
तरी लोकं नुसतेच वाचायचे,
आता नद्या, तलाव, सारंच
सुकलं आहे...उरलं सुरलं पाणी दूषीत होऊन बसलं आहे.
उद्योगधंदे संपलेत,वाढलीये,बेरोजगारी
खाऱ्या पाण्यास पिण्याजोगं करण्याची सारी,तयारी..
तोच एकच उद्योग आहे
कामगार आहेत "पाणी"पगारी
पाण्यासाठी सगळीकडे दंगे सुरु आहेत
आजचे दिवस खूप वेगळे आहेत..
दिवसाला ८ पेले पाणी आधी आवश्यक असे
माझ्यासाठी आज फक्त अर्धा पेला उरला आहे!

कसा दिसतोय माणूस आज,सुकलेला...सुरकुतलेला
अल्ट्रा व्हॉयलेट किरणांनी,पुरता पोळलेला
त्वचा क्षय, मूत्रपिंडांचे आजार
मृत्यूच्या कारणांने ग्रासलेला

पाण्याच्या अभावी विशीचा तरुण
चाळीशीचा दिसतो, पाण्याचा अभाव हेच कारण
पण उपायच नसतो,पाण्याचं उत्पादन अशक्य
हवा नाही, पाणी दूषीत,पुढची पिढी अशीच असणार
रापलेली... पोळलेली... त्रासीत..

जिथे कुठे पाणी असेल,कडेकोट जपल्या जाते,
आलाच पाऊस कधी तर,आम्लवृष्टी होते...
विसाव्या शतकाचा निष्काळजीपणा,आम्ही भोगतोय..
बजावलं होतं पाणी वाचवा, आता आम्ही साहतोय...

माझं बालपण ऐकताना
माझा मुलगा कळवळतो....कुठे गेलं पप्पा पाणी.?पुन्हा पुन्हा
विचारतो.,मी काय बोलू..फक्त आवंढा गिळतो...
या सगळयाला कारणीभूत पिढीचा मी ही एक अंश असतो..

आता माझी मुलं बाळं माझी चूक भोगताहेत...फार मोठी किंमत
माझ्या चुकीची देताहेत...अशीच भोगत राहतील बिचारी कारण
मागे जाणं शक्य नाही...
यापुढे पृथ्वीवर जगणं पण शक्य नाही...

पण कसंतरी करून मला मागे जायलाच हवं! माझ्या पूर्वजांना
कळकळीनं विनवायला हवं...वाचवा हो पाणी....अहो
वाचवायला हवं...अजूनही वेळ गेली नाही
हे समजायला हवं!

# अतिथी संपादकाच्या लेखणीतून..



मला "पर्यावरणावर लिहाल का ?" अशी विचारणा झाली आयुष्यभर सिमेंट, विटा, दगड मातीमध्ये राहिलेल्या मला हा प्रश्न विचारणे म्हणजे केवढा मोठा जोक आहे नाही का ? जरा कुठल्या बांधकामाच्या जवळ एखादा हिरवा कोंब दिसला की शत्रुपक्षातील म्हणून खुडला जायचा, अर्थात हे सगळे पेशा म्हणून नाईलाजाने स्विकारलेले होते. ज्यांना आवडीच्या विषयात शिकायला अथवा करियर करायला मिळाले ते पुण्यवान आणि आमच्या खात्यात बाकी शून्य !! सेवानिवृत्तीनंतर संस्कारभारती या अखिल भारतीय संस्थेशी संबंध आला. सर्व कला व निसर्गाचा अतुट संबंध आहेच त्यातून निसर्गाकडे ओढला गेलेला. निसर्गाचे खच्चीकरण व पर्यावरणाचा ह्रास बघवत नाही, थोडयाश्या द्रव्य लोभापायी आपण आपलेच नाही तर येणाऱ्या अनेक पिढयांचे नुकसान करत आहोत याचे आम्हाला भानही उरलेले नाही .

पर्यावरणाचे संतुलन निसर्ग नियमाप्रमाणे होत असते, आम्ही त्यात लुडबुड केली नाही तर त्याकडे लक्ष देण्याचेही कारण नाही. संस्कारभारतीच्या माध्यमातून गेली ६ वर्ष निसर्गात रममाण झाल्याने त्याचे चित्रीकरण करायची सवय लागली.......पुढे हा निसर्ग माझ्याशी बोलू लागला, आपली सुख दुःखे शेअर करु लागला. नेमका याचवेळी कविता व काव्यांजली यांच्याशी संपर्क आल्याने निसर्गाने मला चित्रकाराचा कवि बनवले . त्या कवितांचा आस्वाद आपण घेतच आहात.......त्यापैकी एक येथे पेश आहे .

नेटाक्षरीच्या ह्या अंकात माझ्या काही पेंटींग्सचा समावेश केल्याबद्दल व मला ह्या विशेषांकासाठी अतिथी संपादकपदाचा बहुमान दिल्याबद्दल नेटाक्षरीचे मनःपूर्वक आभार.

सुरेश पेठे,पुणे
(अतिथी संपादक)



‘काव्यांजली’ आणि ‘मराठी कविता’ तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

## नवरस काव्यस्पर्धा मालिका

यात आहेत साहित्यातील नऊ रस.प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची.
नऊ रस,नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!
ह्या काव्यस्पर्धेचा उद्देश चढाओढ हा नाही,कोणी छोटं-मोठं,कविता चांगली-वाईट सिद्ध करणं हा देखील नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे,सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील,हजारोंपर्यंत जातील,बक्षिसेही असतीलच.
लिहा मंडळी,बघूया महाराष्ट्राच्या उद्याच्या ‘लेखण्या’ काय आहेत ते.

## ह्या महिन्याचा ‘रस’ विषय करुण रस

तुमच्या १/२ करुणरसपूर्ण कविता आम्हांला **१ जून ते १५ जून २००९** पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
ह्या ईमेल पत्त्यावर पाठवा.सोबत आपल्या ऑर्कुट प्रोफाईलची लिंक व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

काळजाच्या अरण्यात करुण रसाचं वादळ उठू देत
शब्दांच्या करुण किमयेनं हुंदक्यांचा बांध फुटू देत

आपल्या लेखण्यांतून शाईच्या रुपानं कारुण्य काव्यरस वाहू देत

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अकं सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

समाप्त